दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर तथा न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग, सिरोंचा, जिल्हा गडचिरोली या न्यायालयासाठी दिवाणी स्वरुपाचे स्वीय प्रपंजी खाते उघडण्याबाबत ...

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
### शासन निर्णय क्रमांकः पीएलए २०१८/प्र.क्र.१८२/का.१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ९ डिसेंबर, २०१९

**वाचा -**

१ प्रबंधक, निरीक्षणे (१), मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे पत्र क्रमांक B(W)A-१९०३ of २०१८/२०७९/३२७८३, दिनांक ६ सप्टेंबर, २०१८

२ प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश गडचिरोली यांचे पत्र क्रमांक वित्त/३५८१/२०१८, दिनांक ०२ ऑगस्ट, २०१८

**प्रस्तावना -**

दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर तथा न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग सिरोंचा यांचे मुख्य लेखाशीर्ष ८४४३-१०६ दिवाणी स्वरुपाचे वैयक्तिक ठेव खाते दिनांक ०१ एप्रिल, २०१५ पासून लेखा व्यवहार न झाल्याने बंद करण्यात आले आहे. महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ नुसार बंद करण्यात आलेले स्वीय प्रपंजी खाते पूर्ववत सुरु करणेबाबत कोणतीही तरतुद नसल्याने नवीन स्वीय प्रपंजी लेखा खाते सुरु करण्यासाठी प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश गडचिरोली यांनी संदर्भाधीन अ.क्र. (२) येथे नमूद दिनांक २ ऑगस्ट, २०१८ रोजीच्या पत्रान्वये मा.उच्च न्यायालय मुंबई यांचेमार्फत प्रस्ताव शासनास सादर केला. त्यास अनुलक्षून दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर तथा न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग सिरोंचा, जिल्हा गडचिरोली यांचे न्यायालयाकरीता दिवाणी स्वरुपाचे स्वीय प्रपंजी लेखा खाते उघडण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर तथा न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग सिरोंचा, जिल्हा गडचिरोली यांचे नावे महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड १ नियम क्रमांक ५१२ नुसार दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर तथा न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग सिरोंचा, जिल्हा गडचिरोली यांचेकडील रकमा जमा करण्यासाठी दिवाणी स्वरुपाचे स्वीय प्रपंजी खाते उघडण्याबाबत यापूर्वी निर्गमित करण्यात आलेले शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून सुधारीत शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे :

दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर तथा न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग सिरोंचा, जिल्हा गडचिरोली यांचे नावे महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ खंड १ नियम क्रमांक ५१२ नुसार दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर तथा न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग सिरोंचा, जिल्हा गडचिरोली कडील रकमा जमा करण्यासाठी दिवाणी स्वरुपाचे स्वीय प्रपंजी खाते उघडण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे :

1) P.L.A. is to be kept operational and to be continued.
2) The said Personal Ledger Account shall be subject to Audit.
3) The Administrator should ensure proper maintenance of Account.
4) Receipt an account of Civil Deposits, Decreetal amount, Consideration money only be deposited / Credited in PLA.
5) No receipt / Expenditure transaction which is to be made through regular Budget Provision shall be incurred from this PLA.
6) The administrator shall carry out reconciliation as per schedule.
7) All provisions under the MTR will be applicable to this P.L.A.
8) This Personal Account will be opened after A.G.(A&E)II, Nagpur issues an authority to open Personal Ledger Account in Nagpur Treasury.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३६६/२०१८/को.प्र.५, दिनांक २८.०९.२०१८अन्वये व महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक TM/Ch.2/UOR/L&JD/2018-19/830, दिनांक ०२.११.२०१८ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०९१५३८४६९११२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagyashree Rajendra Bhaidkar

Digitally signed by Bhagyashree Rajendra Bhaidkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, serialNumber=fb84fefefe4ee219c1bc35b35201c14eab0903e8194a7413a74eed93f32afdb0, cn=Bhagyashree Rajendra Bhaidkar
Date: 2019.12.09 15:44:33 +05'30'

**( भाग्यश्री भाईडकर )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई,

२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्यायालय गडचिरोली,

३. दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर तथा न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग सिरोंचा, जिल्हा गडचिरोली.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई / नागपूर,
५. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई / नागपूर,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा गडचिरोली,
७. उप कोषागार अधिकारी, सिरोंचा, जिल्हा गडचिरोली,
८. वित्त विभाग, मंत्रालय, व्यय-५/कोषा प्रशा ५,
९. कक्ष अधिकारी, का.७/२३/२४/२५, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.निवडनस्ती (का.१२)